राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम, २०१३ अंतर्गत सोलापूर जिल्हयातील लाभार्थ्यांच्या इष्टांकात सुधारणा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन शुध्दिपत्रक क्रमांकः असुका २०१४/प्र.क्र ११६/नापु-२२,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २८ मे, २०१५

**वाचा** :- १) शासन निर्णय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक असुका २०१३/ प्र.क्र ३१९/नापु-२२, दि. १७ डिसेंबर, २०१३.
२) शासन परिपत्रक समक्रमांक दि. २४ मार्च,२०१५.
३) अन्नधान्य वितरण अधिकारी, सोलापूर यांचे पत्र क्र. अधावि/कार्या-२७/ गोदाम-४/आरआर/३६१/२०१५, दि.११.५.२०१५.
४) जिल्हा पुरवठा अधिकारी, सोलापूर यांचे पत्र क्र. २०१५/पुशा/कार्या-२१(२)/ प्र.क्र. २६१/१३/आरआर-९६१, दि.१२.५.२०१५.

राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम, २०१३ नुसार राज्यासाठी ग्रामीण व शहरी भागाकरीता लाभार्थ्यांची संख्या निश्चित करण्यात आली आहे. सदर योजनेचा लाभ घेण्याकरीता लक्ष्य निर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत लाभ घेत असलेल्या लाभार्थ्यांपैकी किती लाभार्थ्यांना लाभ देण्यात यावा याबाबतचा लाभार्थी इष्टांक प्रथमत: संदर्भाधीन दि. १७.१२.२०१३ च्या शासन निर्णयान्वये व तद्नंतर दि. २४.३.२०१५ च्या शासन परिपत्रकान्वये देण्यात आला. परंतु दि. २४.३.२०१५ च्या शासन परिपत्रकान्वये लाभार्थ्यांचा सुधारित इष्टांक देताना सोलापूर जिल्ह्याच्या एकूण इष्टांकाचे जिल्हा पुरवठा अधिकारी व अन्नधान्य वितरण अधिकारी, सोलापूर यांच्या कार्यक्षेत्रातील लाभार्थ्यांच्या विभाजनात शहरी भागातील लाभार्थ्यांचा इष्टांक योग्यरित्या दर्शविण्यात आला नसल्याने त्यामध्ये सुधारणा करण्यात यावी अशी विनंती जिल्हा पुरवठा अधिकारी, सोलापूर व अन्नधान्य वितरण अधिकारी, सोलापूर यांनी त्यांच्या संदर्भाधीन पत्रांन्वये शासनास केली आहे.

**शुध्दिपत्रक** :-

जिल्हा पुरवठा अधिकारी, सोलापूर व अन्नधान्य वितरण अधिकारी, सोलापूर यांनी केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने सोलापूर जिल्ह्यासाठी शहरी भागाकरीता निश्चित केलेल्या एकूण इष्टांकामध्ये बदल न करता दोन्ही क्षेत्रांच्या शहरी भागाकरीताच्या इष्टांकामध्ये याव्दारे बदल करण्यात येत आहे. त्यानुसार दि. २४.३.२०१५ च्या शासन परिपत्रकासोबतच्या प्रपत्र-“ब” मधील अनुक्रमांक १४ वरील सोलापूर ग्रामीण व अनुक्रमांक १५ वरील सोलापूर शहर यांकरीता दर्शविण्यात आलेली आकडेवारी रद्द करण्यात येत असून सदर सुधारित आकडेवारी पुढीलप्रमाणे वाचण्यात यावी.

**प्रपत्र- "ब"**

| अ.क्र. | जिल्हा | Urban लोकसंख्या (CENSUS २०११ नुसार) | Urban Coverage ७६.३२% as per G.R.dt. १७.१२.२०१३ | REVISED AAY TARGET | REVISED PHH TARGET | REVISED URBAN COVERAGE |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | अंत्योदय अन्न योजना | प्राधान्य कुटुंबातील लाभार्थी | |
| | | | | कार्ड संख्या | सदस्य संख्या | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १४ | सोलापूर ग्रामीण | १३९८४३९ | ६३४०५२ | १०४९१ | १५८५१६ | २०३७४६ |
| १५ | सोलापूर शहर | | | ७२०४ | ४२६७६० | ४५७८१६ |

दि. २४.३.२०१५ च्या शासन परिपत्रकातील प्रपत्र-अ मध्ये कोणत्याही प्रकारचे बदल करण्यात आलेले नाहीत.

जिल्हा पुरवठा अधिकारी, सोलापूर व अन्नधान्य वितरण अधिकारी, सोलापूर यांना याद्वारे सुचित करण्यात येते की, या परिपत्रकासोबतच्या प्रपत्र "ब" नुसार शहरी क्षेत्राकरिता नमूद केलेल्या अंत्योदय अन्न योजनेतील उपरोक्त शिधापत्रिकांच्या संख्येइतक्या इष्टांकानुसार तसेच प्राधान्य कुटुंबातील लाभार्थ्यांच्या उपरोक्त सदस्य संख्येइतक्या इष्टांकानुसार दि. १७ डिसेंबर, २०१३ च्या शासन निर्णयातील दिलेल्या परिच्छेद क्र. १ व २ मधील मार्गदर्शक सूचनांनुसार लाभार्थी निवडीबाबतची कार्यवाही करण्यात यावी.

सदर शासन शुध्दिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२८१६५५३७०६०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SATISH SHRIDHAR SUPE

Digitally signed by SATISH SHRIDHAR SUPE
DN: CN = SATISH SHRIDHAR SUPE, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION
Date: 2015.05.28 16:58:24 +05'30'

**(स.श्री. सुपे)**
शासनाचे उपसचिव

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव
४. सर्व मंत्रालयीन विभाग
५. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
६. जिल्हाधिकारी, सोलापूर
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा ,(सोलापूर जिल्हा)
८. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
९. उपायुक्त (पुरवठा), पुणे
१०. जिल्हा पुरवठा अधिकारी, सोलापूर
११. अन्नधान्य वितरण अधिकारी, सोलापूर
१२. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
१३. मा. राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
१४. सर्व अधिकारी (सचिव वगळून), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१५. सर्व कार्यासने, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१६. सर्व खाजगी सचिव, मा. मंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
१७. सर्व खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
१८. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधानभवन, मुंबई
१९. सर्व विधान परिषद सदस्य व विधानसभा सदस्य.
२०. सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
२१. निवडनस्ती (कार्यासन नापु-२२)